**मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., औरंगाबाद यांच्या निवासस्थानाच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन.**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन निर्णय क्र.जिपई-२००८/प्र.क्र.३९१/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ५ जून, २००९.

**संदर्भ** : - १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. पंसई-२००७/प्र.क्र.१३६/पंरा-७,दि.२जाने.,२००८
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,औरंगाबाद यांचे पत्र क्र.जिपऔ/बां/पीबीआर-४/०८,
दिनांक ५.११.२००८ व दिनांक ४.४.२००९

**प्रस्तावना :-**

मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,औरंगाबाद यांचेसाठी नवीन निवासस्थानाच्या रु.३१.४० लक्ष अंदाजपत्रकीय बांधकामाच्या प्रस्तावास संदर्भीय दिनांक-२जानेवारी,२००८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार सदर कामाचे रु.२५.००लक्ष किंमतीचे विस्तृत अंदाजपत्रक तयार करण्यात येवून, जाहीर निविदेद्वारे ८.९९% जास्त दराने सदर काम ठेकेदारास देण्यात आले होते. आता, सदरहू इमारत ही ऐतिहासिक अशा औरंगाबाद नगरीत बांधावयाची असल्याने त्यानुरुप व ऐतिहासिक दृष्टीकोनास साजेशी अशी देखणी इमारत बनविण्याच्या दृष्टीकोनातून डोम तयार करणे, पोर्च तयार करणे इ. स्वरुपाची जास्तीची कामे करणे आवश्यक ठरल्याने त्यानुसार मूळ इमारतीचे बांधकाम मंजूर प्रमा किंमतीत पूर्ण होणे शक्य नसल्याने, सदर कामाच्या रु.३६.१० लक्ष सुधारीत अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., औरंगाबाद यांनी संदर्भीय पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. पंसई-२००७/प्र.क्र.१३६/पंरा-७, दिनांक २ जानेवारी, २००८ अन्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,औरंगाबाद यांचेसाठी नवीन निवासस्थानाच्या बांधकामासाठी देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेमधील किंमतीमध्ये रु.४.७० लक्ष रक्कमेची वाढ करुन, एकूण रु.३६.१० लक्ष (अक्षरी रुपये छत्तीस लक्ष दहा हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत कामाच्या मूळ व सुधारीत अंदाजपत्रकाचा बाब निहाय सर्वसाधारण गोषवारा खालील प्रमाणे आहे :-

| No. | Name of Work | A.A.Cost | Revised.A,A.Cost |
|---|---|---|---|
| 1 | Constuction cost of Civil work | Rs. 1835500.00 | Rs.2428860.00 |
| 2 | Add for Electrification | Rs. 201900.00 | Rs.242886.00 |
| 3 | Water supply and sanitation 10% | Rs. 183500.00 | Rs.242886.00 |
| 4 | Contingencies 4% | Rs. 73400.00 | Rs.97154.00 |
| 5 | Computerisation 2% | Rs. 36700.00 | Rs.48577.00 |
| 6 | Quality Control charges 1/2% | Rs. 9000.00 | --- |
| 7 | Levelling and land scapping lumsum | Rs.250000.00 | Rs.250000.00 |
| 8 | Internal Roads | Rs.200000.00 | Rs.200000.00 |
| 9 | Street Lighting | Rs.100000.00 | Rs.100000.00 |
| 10 | Cost of compound wall | Rs.200000.00 | --- |
| 11 | For appointment & fees of Private Architect | Rs.50000.00 | --- |
| | Total - | **Rs.3140000.00** | **Rs.3610000.00** |

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,औरंगाबाद यांच्या नवीन निवासस्थानाच्या बांधकामासाठी सन २००८-०९ अखेर रु.३१.४० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला असून, सदर इमारतीचे बांधकाम सुरु आहे. सदर कामासाठी उर्वरित निधी अनुदानाच्या स्वरुपात उपलब्धतेनुसार वितरीत केली जाईल.

४. यावरील खर्च "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकरण्यात यावा. यासाठीचा निधी उपलब्धतेनुसार, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B D S) अन्वये संगणकाद्वारे वितरीत करण्यांत येईल.

५. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. **२००९०६०४१९२२०५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद.
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद.
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद औरंगाबाद.
६) कोषागार अधिकारी, जिल्हा औरंगाबाद.
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
८) **उपमुख्य** लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद.
१०) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११) नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत ३).
१३) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४) निवड नस्ती कार्यासन क्र.पं.रा.७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.